म्हैसूर पोथी सटीक नाहीं तरी तिच्या शेवटीं असें लिहिलें आहे—

अस्य शतकस्य व्याख्या कुट्टिकविरचिता विद्यते
प्रीयतां कुट्टिकविना निर्मितेयं सुधी मुदे
भूयाद्वांच्छेश्वर–ग्रंथव्याख्या श्लेषार्थचंद्रिका ॥

येथे श्लेषार्थ–चंद्रिका असें लिहिलें आहे. फक्त अड्यारच्या पोथींत श्लोकार्थ–चंद्रिका असें लिहिलें आहे. तेव्हां श्लेषार्थ–चंद्रिका हेंच नांव खरें असलें पाहिजे. तंजावर व अड्यार या पोथींत ५२ व्या श्लोकाचे टीकेचे शेवटीं लिहिलें आहे :—

एवं माधुर्यादि गुणस्यापि प्रतीतिर्बोध्येति अस्मत्कृत गुरु––
श्लेषार्थचंद्रिकायाम् विस्तरः

यावरून श्लेषार्थ चंद्रिका हें नांव तर ठरलेंच. पण एकाऐवजी २ श्लेषार्थ चंद्रिका झाल्या. ही 'गुरु श्लेषार्थचंद्रिका' अद्याप उपलब्ध झाली नाहीं. तेव्हां याबद्दल मी कांहीं सांगूं शकत नाही.

भांडारकर इन्स्टिट्यूटमधील पोथींचे शेवटीं मिती आहे ती अशी

अन्यष्टार्वधराशाके दुर्मतौ मार्गशीर्षके ।
माहिषं शतकं चारु गोविंदो व्यलिखन् मुदा॥
नीमचग्रामे लिखितमिदं पुस्तकं प्रमोदाय भूयात् सर्वेषाम् सतामिति ।

अग्नी, अष्ट, अर्व, धरा म्हणजे १७८३ शक म्हणजे सन १८६१ म्हणजे उघड उघड ही मिती पोथीची नक्कल केल्याची आहे. श्रीनिवास पंडित यांची गोंधळेकर छापखान्यांत १८७५ सालीं छापलेली पोथी त्यांत टीकेच्या शेवटीं मिती आहे, ती अशी––षट्खेटशैलावनिसंमितेब्दे भावाभिधे माधव–कृष्ण–षठ्याम् । म्हणजे १७९६ शक भावनाम म्हणजे सन १८७४. हीहि मिती त्या टीकेची आहे, काव्याची नाहीं.

यावरून तंजावर भागांतली सर्वांत जुनी पोथी तंजावर येथील आहे. व उत्तरेकडील भागांत भांडारकर इन्स्टिट्यूटमधील आहे.

आतांपर्यंत उपलब्ध झालेल्या पोथ्यांत तंजावर येथील पोथी सर्वांत जुनी आहे. तरी ती अस्सल नाहीं हें मीं वर सांगितलेंच आहे.

कदाचित् मूळ पोथी तंजावर अगर अड्यार येथें नसून ती वांच्छेश्वर यांचें वंशजाकडेच असेल. पण नुकतेच श्रीरंगम् येथें प्रसिद्ध झालेले महिषशतक पुस्तकाचे प्रस्तावनेंत बाल सुब्रम्हण्यं अय्यर यांनीं लिहिलें आहे कीं, कवीचे वंशजाकडून पोथी मागवून त्या आधारानें पुस्तक लिहिलें. त्याच पुस्तकांत श्री, के. एस. व्यंकटरामशास्त्री लिहितातः—

इत्थं महिषशतककर्तृ तद्व्याख्याकृतोः श्रीवांच्छेश्वर शास्त्रिणोः कालेति वृत्तादिकं सर्वमपि तद्वंशीयैः तिरुवसनल्लूर ब्रम्हश्रीरामशास्त्रीभिः लिखित्वा संप्रेषितम् अनुसृत्यैवात्र

लिखितम् । अतस्तदेवात्र प्रमाणं भवति । सव्याख्यास्यास्य मुद्रार्पणेच तिस्रो मातृकाः लब्धाः । एका तावत् श्रीरामशास्त्रिभिः संप्रेषिता । अन्या अडैयार ब्रम्हश्रीरामचंद्रशास्त्रिभिः प्रहिता । अपरा तु आदितः षष्टितमश्लोकपर्यंता पलूवूर वेदांत पाठशालाध्यक्षैः गीतोपन्यास चतुर वेदांत स्थापकः ब्रम्हश्री सुब्रम्हण्यशास्त्रिभिः प्रदत्ता । तिस्रोपि मातृकाः प्रायेण समाना शुद्धा एव । आसां तिसृणां अपि साहाय्यं अवलम्ब्य यथामति संशोध्य प्रकाशीक्रियते । म्हणजे श्रीरंगम् येथील पोथी मूळ पोथी नाहीं.

या पोथीच्या शेवटीं काव्य अगर टीका लेखनाचा काळ लिहिला नाहीं. त्यामुळें ही पोथी जुनी आहे का नवी आहे हें सांगतां येत नाहीं. पण या पोथींत व म्हैसूर तंजावरच्या इतर पोथींत एक फरक आहे व तो म्हणजे काव्य संपल्यानंतरचा लिहिलेला श्लोक. तो श्लोक हा आहे—

> क्षेत्राणामुत्तमानामपि यदुपमया काऽपि लोके प्रशस्तिः ।
> चित्तद्रव्येण मुक्तिक्रयमभिलषतां याऽद्भुता पण्यवीथी ॥
> साक्षात् विश्वेश्वरस्य त्रिभुवनमहिमा या पुरी राजधानी ।
> रम्या काशी सकाशी भवतु हितकरी भुक्तये मुक्तये नः ॥
> प्रियतां कुट्टिकृतिना निर्मितेयं सुधी मुदे ।
> भूयात् वांछेश्वर-ग्रंथ-व्याख्याश्लेषार्थ चंद्रिका ॥

हा वरचा काशीबद्दलचा श्लोक महिषशतकांतला नाहीं व टीकेंतीलहि नाहीं. हा श्लोक आशिर्वादशतक म्हणून जें काव्य वांच्छेश्वर कवीनें लिहिलें आहे त्यांतला १०० वा श्लोक आहे. महिष शतकांत त्याला जागा द्यावयाला नको होती.

दर पोथींत क्रम बदललेला आहे. याचें कारण असें दिसतें कीं, या शतकांत श्लोकाचा परस्पराशीं कांहीं संबंध नाहीं; दरेक श्लोक स्वतंत्र आहे. त्यामुळें कोणचाहि श्लोक कोठेंहि ठेविला तरी काव्यहानि होत नाहीं. म्हणून पोथीची नक्कल करतांना प्रत्येक पंडितानें आपल्या मताप्रमाणें श्लोकांचा अनुक्रम बदलला असें दिसतें. मूळ काव्यांत १०२ श्लोक आहेत असें आपण गृहीत धरू. त्यांत सारेच श्लोक श्लेषात्मक नाहींत. तेव्हा श्लेषात्मक श्लोक एका ठिकाणीं आणणें हा एक हेतु व दुसरा ज्यांची ज्यांची उपमा रेड्याला दिली त्यांच्यात योग्य क्रम. उदाहरणार्थ, रेड्याला उपमा दिली सुग्रीवाची; दुसऱ्या एका श्लोकांत दिली वालीची. ज्याअर्थी सुग्रीव व वाली हे भाऊ भाऊ होते त्याअर्थी हे दोन्ही श्लोक शेजारीं असावेत अशी कल्पना करून ते तंजावर पोथींत वेगळया वेगळया ठिकाणीं आहेत ते त्यांचा क्रम बदलून इतर पोथ्यांतून शेजारी शेजारी आणले. तिसरा हेतु कवीच्या काव्य लिहिण्याच्या वेळची मनःस्थिति लक्षांत घेऊन कोणते श्लोक कोठें घातले तर ते बरे दिसतील हा असला पाहिजे. तो कसा हें तंजावर भागांतील पोथींतला ३ रा श्लोक पाहिला तर कल्पना येईल.

आपलेकडील पोथींतला ३ रा श्लोक असा आहे.

धान्यं वाथ धनानि वा समधिकं कृत्वा मिथः स्पर्धया
मिथ्या साहसिनोऽभ्युपेत्य वृषला देशाधिकाराशया ॥
उत्कोचेन नृपांतिकस्थितजनान् वश्यान् विधायप्रजा–
सर्वस्वं प्रसभं हरन्ति च खला गच्छंतु कालान्तिकम् ॥

आतां अडयार किंवा तंजावरकडील ३ रा श्लोक असा आहे.

नानाजीप्रमुचंद्रभानुशहजीदानंदरायादयो ।
विद्वांसः प्रभवोगताश्रित सुधीसंदोहजीवातवः ॥
विद्यायां विषबुद्धयो हि वृषलास्सभ्यास्त्विदानींतनाः ।
किं कुर्वेम्बरुषे व्रजामि शरणं स्वामेव विश्वावनीम् ॥

वर सांगितलेंच आहे कीं काव्य लिहिण्याचा हेतु ज्या ज्या अधिकाऱ्यांनीं वांच्छेश्वरला त्रास दिला त्यांना शिव्या देणें. पण काव्य लिहिण्याचे नियमाप्रमाणें सुरुवातीस 'आशीर्नमस्क्रिया वस्तुनिर्देशोवाऽपि तन्मुखं' या नियमानें २ आशीर्वादाचे श्लोक लिहिले व नंतर ज्या ज्या अधिकाऱ्यावर कवीचा राग होता त्यांना शाप दिला की ते मरून जावोत. ह्या विचारसरणीप्रमाणें धान्यंवाथ—हा श्लोक ३ रा असणें बरें. दक्षिणेकडील पोथींतील श्लोक म्हणतो कीं ज्या अर्थी आतां विद्येचे चीज होत नाहीं त्या अर्थी मी शेती करण्याचा विचार केला. हा श्लोक फारच मुळमुळींत दिसतो व कवीच्या इतर श्लोकाच्या भाषेवरून हा श्लोक ३ रा नको होता असें वाटतें. दरेक श्लोकाचा क्रम बरा कीं वाईट हें सांगणें थोडया वेळांत शक्य नाहीं म्हणून मीं वरील एकदोनच उदाहरणें घेतलीं.

आतांपर्यंत काव्याबद्दल चर्चा झाली व मूळ काव्याची पोथी कोणती ह्याबद्दल खात्रीलायक माहिती मिळाली नाहीं. आतां ह्या काव्यासंबंधीं कांहीं माहिती प्रसिद्ध झाली आहे ती इतिहासाला धरून नाहीं. उदाहरणार्थः—

श्रीरंगम् येथील पुस्तक १९४६ सालीं छापलें आहे त्यांत कै. बालसुब्रम्हण्यं अय्यर लिहितातः—

After the passing away of king Shahaji his son Pratapsinh ascended the throne. हें विधान किती चुकीचें आहे.

ह्या ( रा. ब. पारसनीस यांचें तंजावरचें राजघराणें पान ५९ ) वरून उघड आहे कीं; प्रतापसिंह हा शहाजीचा मुलगा नव्हता व शहाजीचें नंतर लगेच गादीवर आला नाहीं. मध्यंतरीं २८ वर्षांचा काळ गेला आहे. तेव्हां असें चुकीचें विधान करावयास नको होतें. त्याच पुस्तकांत श्री. के. एस. वेंकटरामशास्त्री यांनीं संस्कृतमध्यें प्रस्तावना लिहिली आहे. त्यांतही असेंच चुकीचें विधान केलें आहे. ते म्हणतातः—

एवं स्थिते एकोजी महाराजादनंतरं तत्कुमारो बालकः प्रतापसिंहो यदा सिंहासन-मारुरोह, इत्यादि.

प्रतापसिंह हा एकोजीचा मुलगा नाहीं. तो तुकोजीचा मुलगा व एकोजीनंतरही गादीवर आला नाहीं; तर मध्यें सुजनबाई व सयाजी यांच्यानंतर तो गादीवर आला. तेव्हां वरील विधान इतिहासाला धरून नाहीं.

आतांपर्यंत आपण टीकाकार वांच्छेश्वर यांचेबद्दल कांहींच लिहिलें नाहीं. त्यांचेबद्दल इतिहासांत बरीच माहिती सांपडते. टीकाकार वांच्छेश्वर हा कवी वांच्छेश्वर यांचा पणतू. हे टीकेंतच सुरुवातीस लिहिलें आहे. यानें पुष्कळच ग्रंथ लिहिले आहेत असें कळतें. श्री. पी. के. गोडे यांनीं या वांच्छेश्वरवर बराच मोठा निबंध १९३९ सालीं लिहिला आहे व तो भांडारकर इन्स्टिट्यूटच्या Annals मध्यें प्रसिद्ध झाला आहे. तेव्हां त्याबद्दल आतां पुनरुक्ती करण्याची जरूर नाहीं. त्यांत पान १७ वर लिहिलें आहे कीं, श्लेषार्थचंद्रिका वांच्छेश्वरनें केव्हां लिहिली ती माहिती नाहीं. पण आपल्याला मी अगोदरच सांगितलें आहे कीं श्लेषार्थचंद्रिका सन १८१३ सालीं काशीमध्यें लिहिली. ह्याच वांच्छेश्वरनें महालिंगशतक लिहिलें आहे. तें केव्हां लिहिलें माहित नाहीं. आणखी एक ग्रंथ यानें लिहिला अशी माहिती श्री सिद्धेश्वर-शास्त्री चित्राव यांच्या मध्ययुगीन चरित्रकोष पान ७३१ वर सांपडते ती अशी.

वांच्छेश्वर यानें सन १८१८ सत्याशाढ श्रौतसूत्राच्या चोविसाव्या वांच्छेश्वरी महा-लिंगाख्या नांवाची टीका यानें लिहिली आहे. फक्त त्या प्रश्नांतील आठव्या प्रश्नावर टीका नाहीं. हा सन १८१६ मध्यें परशरामभाऊ पटवर्धन यांच्या आश्रयाला होता.

श्री. गोडे यांचे यादींत ११ ग्रंथ आहेत, त्यांत ४ था माहिषशतक व्याख्या व १० वा श्लेषार्थ-चंद्रिका असे २ ग्रंथ लिहिले आहेत. हे दोन निराळे ग्रंथ नसून एकाचीच २ निराळीं नांवें आहेत असें दिसतें. म्हणजे गोडे यांचे यादीप्रमाणें १० ग्रंथ झाले. ११ वा महालिंगशतक व १२ वा वांच्छेश्वरी महालिंगाख्या, १३ वा हिरण्य-केशी श्रौत सूत्रव्याख्या असे एकंदर १३ ग्रंथ झाले. आणखी मागें उल्लेख केलेला गुरु श्लेषार्थ चंद्रिका हा—जर वेगळा ग्रंथ असेल तर तो १४ वा.

हे सारे ग्रंथ सन १८१३ चे नंतर लिहिले आहेत. श्लेषार्थचंद्रिका १८१३ मध्यें लिहिली हें आतां सिद्ध केलें आहे.

या वांच्छेश्वरचा पूर्वेतिहास पुष्कळच सांपडतो. पण त्यांत कालनिर्णयाचा घोटाळा आहे.

हा वांच्छेश्वर १७८० चे सुमारास जन्माला आला असें श्री. गोडे ह्यांनीं लिहिलें आहे तें बरोबर दिसतें. बालपणांत तो आपल्या गांवीं तिरुवसनल्लूर येथें ईश्वरशास्त्री

यांचेकडे वेदव्याकरण, पूर्व मीमांसा वगैरे शिकला. त्यानंतर त्याचे गांवाचे जवळ २ कोसांवर असलेल्या मणलूर गावीं श्रीनिवास पंडिताजवळ त्यानें अध्ययन केलें. व १८ वर्षांचें वय असतांनाच अध्यात्मशास्त्राशिवाय सर्व विद्यांत पारंगत झाला. ह्यावेळेस अमरसिंह राजे मध्यार्जुन क्षेत्रांत श्री महालिंगेश्वराची सेवा करण्यास आले. त्यावेळेस बंगालमधून एक नैयायिक पंडित तेथें आले व त्यानीं सर्व पंडितांना वादांत जिंकिलें. त्यामुळें अमरसिंह राजाला वाईट वाटलें. तेव्हां हा वांच्छेश्वर पुढे झाला व त्या बंगाली पंडितांना वादांत हरवलें व अमरसिंहानी वांच्छेश्वराला 'मणिकुट्टि' अथवा 'चिंतामणिकुट्टी' अशी पदवी दिली. अमरसिंह १७९८ सालीं पदच्युत झाले म्हणजे वांच्छेश्वराचें १८ वर्षें वय धरून जन्म वेळ १७८० त येते.

पुढें सन १८०० मध्यें दुसऱ्या सरफोजीनें ओरत्तनाडू नांवाच्या गावीं वेद-पाठशाळा स्थापन केली. तेथें पुष्कळ विद्वान् पंडित जमविले त्यांत वांच्छेश्वरही होता व तो शिष्यांना शिकवत असे. तेथें असतांना कांहीं कारणावरून वांच्छेश्वर व सरफोजी यांचा बबनाव झाला व यापुढें परतंत्रांत राहावयाचें नाहीं असें ठरवून तीर्थ-यात्रा करण्याच्या निमित्तानें बाहेर पडले ते उत्तरेस गेले. काहीं दिवसांनीं ते पुण्यास आले त्यावेळेस दुसरा बाजीराव पुण्यास होता. त्याचे दरबारांत चंद्रा नारायण भट्टाचार्य हे पंडित होते. प्रथम ह्या भट्टाचार्यानें वांच्छेश्वराची भेट घेण्यास नाखुशी दर्शविली. पण काहीं दिवसांनीं एकदांची त्यांची गांठ पडली व लवकरच भट्टाचार्य यांना वांच्छेश्वराची विद्वत्ता कळून आली व तेथें दरबार पंडित म्हणून यांची नेमणूक केली. बाजीरावानें त्याला हिरण्यकेशीय श्रौतसूत्रावर टीका लिहिण्यास सांगितलें व ती त्यांनीं लिहिली. **काहीं वर्षे पुण्यास राहून नन्तर वांच्छानाथ काशीस गेले** व अहोबलशास्त्री यांचेकडे अभ्यास केला व तेथेंच राहून पुष्कळसे ग्रंथ लिहिले व नंतर पुन्हा पुण्यास आले व तेथून ते म्हैसूरकडे गेले अशी माहिती श्री. वेंकटशास्त्री यांनीं दिली आहे.

आतां या माहितीचा इतिहासाशीं मेळ कसा बसतो तें पाहूं.

स. १८१३ सालीं वांच्छानाथ काशीमध्यें होते हें श्लेषार्थचंद्रिकेवरून दिसतें. व १८१६ सालीं पुण्यास आल्यावर हिरण्यकेशी श्रौत-सूत्रावर व्याख्या लिहिण्यास सुरुवात केली; त्याची मिती अशी

> वस्वग्न्यद्रिक्षिति मिते शके वांच्छेश्वर सुधीः ।
> हिरण्यकेशीनां सूत्रं व्याख्यातुमुपचक्रमे ॥

वसु, अग्नि; अद्रि क्षिति म्हणजे १७३८ शक सन १८१६ या वर्षी टीकेचें काम सुरू झालें. त्यावेळेस वांच्छानाथ हे पटवर्धनांचे आश्रित होते असें २६ नोव्हेंबर १८१६ च्या पासपोर्ट मध्यें लिहिलें आहे. म्हणजे १८१६ सालीं ते पुण्यास

होते व ते १८१८ पर्यंत पटवर्धनांकडे राहिले व पुढें म्हैसूरकडे गेले. यावरून हें नक्की झालें कीं १८१६ चे नंतर ते काशीला गेले नाहींत. १८०० सालीं स्थापन केलेल्या ओरत्तनाडू येथील वेधशाळेंत ते शिक्षक होते. व तेथेंच सरफोजीचा व त्यांचा बेबनाव झाला व तेथून लगेच ते उत्तरेकडे निघाले. म्हणजे सन १८०० चे नंतर १–२ वर्षांत ते उत्तरेकडे निघाले असें समजावयाला हरकत नाहीं. आतां १८०२ ते १८१३ वांच्छेश्वर कोठे होते हा प्रश्न उरला. १८१६ चे नंतर जर काशीला गेले नाहींत तर

काशी–यात्रेच्छया गच्छन् कृष्णातीर–निवासिभिः।
पट्टवर्धन–वंशस्थैः प्रभुभिः संगतो मुदा ॥

ह्या श्लोकांत **काशीयात्रेच्छया गच्छन्** या वाक्याचा अर्थ बरोबर लागत नाहीं. पटवर्धनांची भेट काशी यात्रेला जातांना झाली हें इतिहासदृष्ट्या विसंगत दिसतें. जर तंजावर किंवा आरतनाडू येथून निघाल्यापासून परत म्हैसूर भागांत येईपर्यंतचा प्रवास हा सर्व काशी–यात्रेचाच प्रवास, असा अर्थ केला तर श्लोकाचा अर्थ बरोबर जमेल. याबद्दल पंडित अय्यास्वामि भाट्ट–चिंतामणिचे प्रस्तावनेंत लिहितात कीं,

काशीतः आगमन समये ... ... अयं यज्वा माधवराव परशुराम पट्टवर्धनादिभिः अति मात्र माद्रतः। हें विधान मात्र इतिहासाचे दृष्टीनें बरोबर दिसतें.

वांच्छेश्वर पुण्यांत आले तेव्हां दुसरे बाजीराव होते,व दरबार पंडित चंदानारायण भट्टाचार्य होते. यावरून येवढेंच कळतें कीं सन १८०० ते १८१८ पर्यंत ते पुण्यास आले. ते जर १८१५ चे पूर्वी पुण्यास आले होते व त्याच वेळेस हिरण्यकेशि सूत्रावर व्याख्या लिहिण्यास सांगितली तर १८१६ पर्यंत कां लिहिली नाहीं ? पुण्याहून काशीस गेले, तर काशीला जातांना पासपोर्ट वगैरे कांहीं लागले नाहींत कां ? आतां दुसरा प्रश्न म्हणजे वांच्छेश्वर यांनीं टीकेच्या सुरुवातीस सांगितलें कीं त्यांचे गुरू ईश्वर शास्त्री श्रीनिवास शास्त्री व अहोबल शास्त्री हे गुरू होते. ईश्वरशास्त्री व श्रीनिवासशास्त्री हे त्यांचे वयाचे १८।२० वर्षांपर्यंत होते व पुढें ते वांच्छेश्वर ओरतनाडू येथून निघून उत्तरेस गेले. ते जर प्रथम पुण्यास आले व बरेच वर्षे पुण्यास राहून नंतर काशीस गेले; तर तें अहोबलशास्त्र्यांजवळ अध्ययन करावयास केव्हां राहिले. अहोबलशास्त्री तर वांच्छेश्वरच्या बाळपणांत ४।५ वर्षांच्या वयाचे असतांना म्हणजे टिपुराजा असतानांच रागावून काशीला गेले असें श्री वेंकटरामशास्त्री लिहितात; तर त्यांनीं अहोबलशास्त्री यांचेकडे अभ्यास केव्हां केला व काशीस असतांना बरींच पुस्तकें लिहिलीं तीं केव्हां लिहिलीं. ह्या सर्व गोष्टी पुण्यास दोनदां आले असें धरलें तर जमत नाहींत. म्हणून मला वाटतें की ते ओरतनाडू येथून १८०१।२ सालीं निघाले ते तडक काशीस गेले व तेथें अहोबल-

शास्त्री यांचेपाशीं अध्ययन केलें व श्री. नृसिंहभारती यांना शिकविलें व १८१६ चे पूर्वी व १८१३ चे नंतर पुण्यास आले, सन १८१३ चे अगोदर पुण्यास आलेच नाहींत असें माझें स्वतःचें मत आहे.

मागें मीं सांगितलें आहे कीं, "अड्यार" या पोथीनें बराच घोटाळा केला आहे तो कसा तें पाहूं.

आतांपर्यंतच्या वादापासून तंजावर येथील पोथी सर्वांत जुनी आहे. म्हणून तीच कवीनें लिहिलेली पोथी म्हणून आपण गृहीत धरित आलों. ह्या पोथींत १०२ श्लोक आहेत. व तेच श्लोक अड्यार, म्हैसूर व श्रीरंगम् येथील पोथींत आहेत. तेव्हां तंजावरची पोथी मूळ पोथी ठरविली. आतां उत्तरेकडच्या पोथींतून १०७ श्लोक आहेत. म्हणजे कोणते तरी ५ श्लोक प्रक्षिप्त आहेत. व ते म्हणजे भांडारकर इन्स्टिट्यूट पोथींतले श्लोक नं. २९, ८८, ९१, ९२ व १३ हे श्लोक अड्यार, तंजावर म्हैसूर व श्रीरंगम् या पोथींत नाहींत; पण अड्यार तेलगू म्हणून जी पोथी आहे असें सांगितलें त्यांत श्लोक नं. २९, ८८, ९१ व ९२ आहेत. "अड्यार तेलगू" ही पोथी तर जुनी आहे असें के. माधवकृष्ण शर्मा म्हणतात. मग हे श्लोक यांत कसे आले व बाकीच्या पोथ्यांतून कां वगळले ? तेव्हां हे श्लोक जर जुनेच आहेत असें धरलें तर फक्त १ च श्लोक प्रक्षिप्त राहिला व तो म्हणजे १३ वा. हा घोटाळा ही पोथी हातीं आल्याशिवाय निकालांत निघणें शक्य दिसत नाहीं. तेव्हां हा निबंध वाचण्याचा हेतु एवढाच कीं, या काव्याबद्दलची माहिती समग्र व इतिहासाला धरून असावी व या दृष्टीनें ज्या ज्या गोष्टी मला विसंगत दिसल्या किंवा ज्या गोष्टींचा निर्णय मला करतां आला नाहीं त्या गोष्टी आपल्यापुढें मांडल्या आहेत व आपण याचा विचार करून उणीव भरून काढण्यास मदत करावी.

---

# ९ "सभासद"

(इ. स. १२००—१८१८.)

(ले. विठ्ठल त्र्यंबक गुण्ये, एम्. ए.)

**कागदपत्रांतील उल्लेख—**

(१) "पा हुजुरू बा सान आलीशान रफअल मकान शहानवाज़खान **मजालसी हुज़ुरु**"

(ऐ. फा. सा. सं. ३ ले ३५ ता. १६०३ फेब्रु. ५)

( २ ) " दुसरा इब्राहीम आदिलशाह—शाह नवाजखान **सरमज्लिसी** याजतर्फेचे अधिकारी व देसाई परगणे गदग. "

( ऐ. फा. सा. खं. ३ ले. ४४, **ता. १६१६ जाने. २४.** )

( ३ ) " दुसरा इब्राहीम आदिलशाह—देसाई परगणे गदग.
............हुप. व दियानतुल्मुल्क **सरे मजलिस** याच्या माहितीनें "

( ऐ. फा. सा. खं. ३ ले. ५६, **ता. १६२१ फेब्रु. ८.** )

( ४ ) " दुसरा इब्राहीम आदिलशाह—देसाई परगणे गदग.
............हुप फर्जंद शाहनवाझखान **सर मजलिस** याच्या माहितीनें "

( ऐ. फा. सा. खं. ३ ले. ५९, **ता. १६४४ डिसें. ६.** )

( ५ ) " दुसरा इब्राहीम आदिलशाह—देसाई परगणे गदग.
............हुप. फर्जंद शाह नवाझखान **सरे मजलिस** याच्या माहितीनें "

( ऐ. फा. सा. खं. ३ ले. ६० **ता. १६२५ मार्च १.** )

( ६ ) " ( फारसी मजकूर ) व हाजीरमजालस.
मसरुलहजरत रायाजी रो पंडित **मजालसी** ........"

महजरांतील उल्लेख; ( शि. च. सा. खं. ३ ले. ६३८
**इ. स. १६५४ जाने. १.** )

( ७ ) " रख्तखाना
............राजश्री बावाजी नाईक पुंडे **मजालसी**, राजश्री बाळाजी हरि **मजालसी** "

महजरमजलसींतील उल्लेख—( शिवाजीमहाराज हजर ).

( म. इ. सा. खं. १७ ले. १०, **१६५७ मार्च २१.** )

( ८ ) " निवाडपत्र हाजीर मजालसी

राजमुद्रा

पदो नारायण **सभासद नामजाद** किल्ले कोंडाणा "

( शि. च. सा. खं. २ ले. ९८, **१६५८ आक्टो. ३.** )

( ९ ) " दुसरा अली आदिलशाह—देसाई तपे साळशी
………… बाचाजी शाम…… ( पडिंत १ ) **मजलिसी व सुभेदार तळकोंकण** "
( ऐ. फा. सा. खं. ३, ले. ९२, **१६६१ डिसें. २०.** )

(१०) " अलि आदिलशाह—देसाई परगणे कागल
………… हरि अमीनराव मजलसी……… **दियानतराव मजलसी** "
( ऐ. फा. सा. खं. १, ले. ३०, **१६७४ मार्च १.** )

(०१) " पत्रवेतन विशेष. मा। शंकराजी बाजी प्रभु **सभासद सेवक** राजमंडल
………… शंकराजी नारायण याजकडे सभासदाची सेवा करीत होते ………… सभासदांतच करार करून सरंजामी केली २००० होनू

ता।

सा। जातीस बेडा च्याकर २४ यैन ४००

१६००

येकूण १॥ बेडा दोन हजार यास कदीम वेतन दीड हजार व हाली सरंजाम पांचशे होनू. येणे प्रो रास केले असेती. "
( पेशवा दप्तर. वि. ३१ प. नं. ५९, **१६९३ मे २७.**)

( १२ ) " महजरनामा…… हाजीरमजालसी……
……राजश्री महादजी बाबाजी **सभासद**
राजश्री केशो बाजी **सभासद** राजश्री रंगोराम **सभासद**
मुद्रा मराठी दि॥ सरसुभा
( श्री राजाराम पदपंकज राजश्री बहिरो त्रिमल.
सेवनी तत्पर केसो बाजी ) मुद्रा "
( ऐ. सं. सा. खं. ६ ले. ९, **१६९४ एप्रील १२.** )

( १३ ) महजराच्या मजकुरांतील उल्लेख.
" महादाजी बलाल सभासद नामजाद सुभा मामले दाभोल
………**बाळाजी विश्वनाथ सभासद………** "
" मजलसीत राजश्री बाळाजी विश्वनाथ देशमूख मामलेदंडा राजापुरी "
( म. इ. सा. खं. २१ ले. ८, **१६९७ मे १६.** )

लिखितम् । अतस्तदेवात्र प्रमाणं भवति । सव्याख्यास्यास्य मुद्रापणेच तिस्रो मातृकाः लब्धाः । एका तावत् श्रीरामशास्त्रिभिः संप्रेषिता । अन्या अडैयार ब्रम्हश्रीरामचंद्रशास्त्रिभिः प्रहिता । अपरा तु आदितः षष्टितमश्लोकपर्यंता पलूवूर वेदांत पाठशालाध्यक्षैः गीतोपन्यास चतुर वेदांत स्थापक ब्रम्हश्री सुब्रम्हण्यशास्त्रिभिः प्रदत्ता । तिस्रोपि मातृकाः प्रायेण समाना शुद्धा एव । आसां तिसृणां अपि साहाय्यं अवलम्ब्य यथामति संशोध्य प्रकाशीक्रियते । म्हणजे श्रीरंगम् येथील पोथी मूळ पोथी नाहीं.

या पोथीच्या शेवटीं काव्य अगर टीका लेखनाचा काळ लिहिला नाहीं. त्यामुळें ही पोथी जुनी आहे का नवी आहे हें सांगतां येत नाहीं. पण या पोथींत व म्हैसूर तंजावरच्या इतर पोथींत एक फरक आहे व तो म्हणजे काव्य संपल्यानंतरचा लिहिलेला श्लोक. तो श्लोक हा आहे—

क्षेत्राणामुत्तमानामपि यदुपमया काऽपि लोके प्रशस्तिः ।
चित्तद्रव्येण मुक्तिक्रयमभिलषतां याऽद्भुता पण्यवीथी ॥
साक्षात् विश्वेश्वरस्य त्रिभुवनमहिमा या पुरी राजधानी ।
रम्या काशी सकाशी भवतु हितकरी भुक्तये मुक्तये नः ॥
प्रियतां कुट्टिकृतिना निर्मितेयं सुधी मुदे ।
भूयात् वांछेश्वर–ग्रंथ–व्याख्याश्लेषार्थ चंद्रिका ॥

हा वरचा काशीबद्दलचा श्लोक महिषशतकांतला नाहीं व टीकेंतीलहि नाहीं. हा श्लोक आशिर्वादशतक म्हणून जें काव्य वांछेश्वर कवीनें लिहिलें आहे त्यांतला १०० वा श्लोक आहे. महिष शतकांत त्याला जागा द्यावयाला नको होती.

दर पोथींत क्रम बदललेला आहे. याचें कारण असें दिसतें कीं, या शतकांत श्लोकाचा परस्पराशीं कांहीं संबंध नाहीं; दरेक श्लोक स्वतंत्र आहे. त्यामुळें कोणचाहि श्लोक कोठेंहि ठेविला तरी काव्यहानि होत नाहीं. म्हणून पोथीची नक्कल करतांना प्रत्येक पंडितानें आपल्या मताप्रमाणें श्लोकांचा अनुक्रम बदलला असें दिसतें. मूळ काव्यांत १०२ श्लोक आहेत असें आपण गृहीत धरू. त्यांत सारेच श्लोक श्लेषात्मक नाहींत. तेव्हा श्लेषात्मक श्लोक एका ठिकाणीं आणणें हा एक हेतु व दुसरा ज्यांची ज्यांची उपमा रेड्याला दिली त्यांच्यांत योग्य क्रम. उदाहरणार्थ, रेड्याला उपमा दिली सुग्रीवाची; दुसऱ्या एका श्लोकांत दिली वालीची. ज्याअर्थी सुग्रीव व वाली हे भाऊ भाऊ होते त्याअर्थीं हे दोन्ही श्लोक शेजारीं असावेत अशी कल्पना करून ते तंजावर पोथींत वेगळया वेगळया ठिकाणीं आहेत ते त्यांचा क्रम बदलून इतर पोथ्यांतून शेजारी शेजारी आणले. तिसरा हेतु कवीच्या काव्य लिहिण्याच्या वेळची मनःस्थिति लक्षांत घेऊन कोणते श्लोक कोठें घातले तर ते बरे दिसतील हा असला पाहिजे. तो कसा हें तंजावर भागांतील पोथींतला ३ रा श्लोक पाहिला तर कल्पना येईल.

आपलेकडील पोथींतला ३ रा श्लोक असा आहे.

धान्यं वाथ धनानि वा समधिकं कृत्वा मिथः स्पर्धया
मिथ्या साहसिनोऽभ्युपेत्य वृषला देशाधिकाराशया ॥
उत्कोचेन नृपांतिकस्थितजनान् वश्यान् विधायप्रजा–
सर्वस्वं प्रसभं हरन्ति च खला गच्छंतु कालान्तिकम् ॥

आतां अडयार किंवा तंजावरकडील ३ रा श्लोक असा आहे.

नानाजीप्रभुचंद्रभानुशहजीदानंदरायादयो ।
विद्वांसः प्रभवोगताश्रित सुधीसंदोहजीवातवः ॥
विद्यायां विषबुद्धयो हि वृषलास्सभ्यास्त्विदानींतनाः ।
किं कुर्वेम्बरूपे व्रजामि शरणं त्वामेव विश्वावनीम् ॥

वर सांगितलेंच आहे कीं काव्य लिहिण्याचा हेतु ज्या ज्या अधिकाऱ्यांनीं वांच्छेश्वराला त्रास दिला त्यांना शिव्या देणें. पण काव्य लिहिण्याचे नियमाप्रमाणें सुरुवातीस 'आशीर्नमस्क्रिया वस्तुनिर्देशोवाऽपि तन्मुखं' या नियमानें २ आशीर्वादाचे श्लोक लिहिले व नंतर ज्या ज्या अधिकाऱ्यावर कवीचा राग होता त्यांना शाप दिला की ते मरून जावोत. ह्या विचारसरणीप्रमाणें धान्यंवाथ—हा श्लोक ३ रा असणें बरें. दक्षिणेकडील पोथींतील श्लोक, म्हणतो कीं ज्या अर्थी आतां विद्येचे चीज होत नाहीं त्या अर्थी मी शेती करण्याचा विचार केला. हा श्लोक फारच मुळमुळींत दिसतो व कवीच्या इतर श्लोकाच्या भाषेवरून हा श्लोक ३ रा नको होता असें वाटतें. दरेक श्लोकाचा क्रम बरा कीं वाईट हें सांगणें थोड्या वेळांत शक्य नाहीं म्हणून मीं वरील एकदोनच उदाहरणें घेतलीं.

आतांपर्यंत काव्याबद्दल चर्चा झाली व मूळ काव्याची पोथी कोणती ह्याबद्दल खात्रीलायक माहिती मिळाली नाहीं. आतां ह्या काव्यासंबंधीं कांहीं माहिती प्रसिद्ध झाली आहे ती इतिहासाला धरून नाहीं. उदाहरणार्थः—

श्रीरंगम् येथील पुस्तक १९४६ सालीं छापलें आहे त्यांत कै. बालसुब्रम्हण्यं अय्यर लिहितातः—

After the passing away of king Shahaji his son Pratapsinh ascended the throne. हें विधान किती चुकीचें आहे.

ह्या ( रा. ब. पारसनीस यांचें तंजावरचें राजघराणें पान ५९ ) वरून उघड आहे कीं; प्रतापसिंह हा शहाजीचा मुलगा नव्हता व शहाजीचें नंतर लगेच गादीवर आला नाहीं. मध्यंतरीं २८ वर्षांचा काळ गेला आहे. तेव्हां असें चुकीचें विधान करावयास नको होतें. त्याच पुस्तकांत श्री. के. एस. वेंकटरामशास्त्री यांनीं संस्कृतमध्यें प्रस्तावना लिहिली आहे. त्यांतही असेंच चुकीचें विधान केलें आहे. ते म्हणतातः—

एवं स्थिते एकोजी महाराजादनंतरं तत्कुमारो बालकः प्रतापसिंहो यदा सिंहासन-मारुरोह, इत्यादि.

प्रतापसिंह हा एकोजीचा मुलगा नाहीं. तो तुकोजीचा मुलगा व एकोजीनंतरही गादीवर आला नाहीं; तर मध्यें सुजनबाई व सयाजी यांच्यानंतर तो गादीवर आला. तेव्हां वरील विधान इतिहासाला धरून नाहीं.

आतांपर्यंत आपण टीकाकार वांच्छेश्वर यांचेबद्दल कांहींच लिहिलें नाहीं. त्यांचेबद्दल इतिहासांत बरीच माहिती सांपडते. टीकाकार वांच्छेश्वर हा कवी वांच्छेश्वर यांचा पणतू. हे टीकेंतच सुरुवातीस लिहिलें आहे. यानें पुष्कळच ग्रंथ लिहिले आहेत असें कळतें. श्री. पी. के. गोडे यांनीं या वांच्छेश्वरवर बराच मोठा निबंध १९३९ सालीं लिहिला आहे व तो भांडारकर इन्स्टिटयूटच्या Annals मध्यें प्रसिद्ध झाला आहे. तेव्हां त्याबद्दल आतां पुनरुक्ती करण्याची जरूर नाहीं. त्यांत पान १७ वर लिहिलें आहे कीं, श्लेषार्थचंद्रिका वांच्छेश्वरनें केव्हां लिहिली ती माहिती नाहीं. पण आपल्याला मी अगोदरच सांगितलें आहे कीं श्लेषार्थचंद्रिका सन १८१३ सालीं काशीमध्यें लिहिली. त्याच वांच्छेश्वरनें महालिंगशतक लिहिलें आहे. तें केव्हां लिहिलें माहित नाहीं. आणखी एक ग्रंथ यानें लिहिला अशी माहिती श्री सिद्धेश्वर शास्त्री चित्राव यांच्या मध्ययुगीन चरित्रकोष पान ७३१ वर सांपडते ती अशी.

वांच्छेश्वर यानें सन १८१८ सत्याशाढ श्रौतसूत्राच्या चोविसाव्या वांच्छेश्वरी महालिंगाख्या नांवाची टीका यानें लिहिली आहे. फक्त त्या प्रश्नांतील आठव्या प्रश्नावर टीका नाहीं. हा सन १८१६ मध्यें परशरामभाऊ पटवर्धन यांच्या आश्रयाला होता.

श्री. गोडे यांचे यादींत ११ ग्रंथ आहेत, त्यांत ४ था माहिषशतक व्याख्या व १० वा श्लेषार्थ-चंद्रिका असे २ ग्रंथ लिहिले आहेत. हे दोन निराळे ग्रंथ नसून एकाचेच २ निराळीं नांवें आहेत असें दिसतें. म्हणजे गोडे यांचे यादीप्रमाणें १० ग्रंथ झाले. ११ वा महालिंगशतक व १२ वा वांच्छेश्वरी महालिंगाख्या, १३ वा हिरण्य-केशी श्रौत सूत्रव्याख्या असे एकंदर १३ ग्रंथ झाले. आणखी मागें उल्लेख केलेला गुरु श्लेषार्थ चंद्रिका हा—जर वेगळा ग्रंथ असेल तर तो १४ वा.

हे सारे ग्रंथ सन १८१३ चे नंतर लिहिले आहेत. श्लेषार्थचंद्रिका १८१३ मध्यें लिहिली हें आतां सिद्ध केलें आहे.

या वांच्छेश्वरचा पूर्वेतिहास पुष्कळच सापडतो. पण त्यांत कालनिर्णयाचा घोटाळा आहे.

हा वांच्छेश्वर १७८० चे सुमारास जन्माला आला असें श्री. गोडे ह्यांनीं लिहिलें आहे तें बरोबर दिसतें. बालपणांत तो आपल्या गांवीं तिरुवसनल्लूर येथें ईश्वरशास्त्री

यांचेकडे वेद्व्याकरण, पूर्व मीमांसा वगैरे शिकला. त्यानंतर त्याचे गांवाचे जवळ २ कोसांवर असलेल्या मणलूर गावीं श्रीनिवास पंडिताजवळ त्यानें अध्ययन केलें. व १८ वर्षांचें वय असतांनाच अध्यात्मशास्त्राशिवाय सर्व विद्यांत पारंगत झाला. त्यावेळेस अमरसिंह राजे मध्यार्जुन क्षेत्रांत श्री महालिंगेश्वराची सेवा करण्यास आले. त्यावेळेस बंगालमधून एक नैयायिक पंडित तेथें आले व त्यानीं सर्व पंडितांना वादांत जिंकिलें. त्यामुळें अमरसिंह राजाला वाईट वाटलें. तेव्हां हा वांच्छेश्वर पुढे झाला व त्या बंगाली पंडितांना वादांत हरवलें व अमरसिंहानी वांच्छेश्वराला 'मणिकुट्टि' अथवा 'चिंतामाणिकुट्टी' अशी पदवी दिली. अमरसिंह १७९८ सालीं पदच्युत झाले म्हणजे वांच्छेश्वराचें १८ वर्षें वय धरून जन्म वेळ १७८० त येते.

पुढें सन १८०० मध्यें दुसऱ्या सरफोजीनें ओरत्तनाडू नांवाच्या गावीं वेद-पाठशाळा स्थापन केली. तेथें पुष्कळ विद्वान् पंडित जमविले त्यांत वांच्छेश्वरही होता व तो शिष्यांना शिकवत असे. तेथें असतांना कांहीं कारणावरून वांच्छेश्वर व सरफोजी यांचा बबनाव झाला व यापुढें परतंत्रांत राहावयाचें नाहीं असें ठरवून तीर्थ-यात्रा करण्याच्या निमित्तानें बाहेर पडले ते उत्तरेस गेले. काहीं दिवसांनीं ते पुण्यास आले त्यावेळेस दुसरा बाजीराव पुण्यास होता. त्याचे दरबारांत चंदा नारायण भट्टाचार्य हे पंडित होते. प्रथम ह्या भट्टाचार्यानें वांच्छेश्वराची भेट घेण्यास नाखुशी दर्शविली. पण काहीं दिवसांनीं एकदांची त्यांची गांठ पडली व लवकरच भट्टाचार्य यांना वांच्छेश्वराची विद्वत्ता कळून आली व तेथें दरबार पंडित म्हणून यांची नेमणूक केली. बाजीरावानें त्याला हिरण्यकेशीय श्रौतसूत्रावर टीका लिहिण्यास सांगितलें व ती त्यांनीं लिहिली. **काहीं वर्षें पुण्यास राहून नन्तर वांच्छानाथ काशीस गेले** व अहोबलशास्त्री यांचेकडे अभ्यास केला व तेथेंच राहून पुष्कळसे ग्रंथ लिहिले व नंतर पुन्हा पुण्यास आले व तेथून ते म्हैसूरकडे गेले अशी माहिती श्री. वेंकटशास्त्री यांनीं दिली आहे.

आतां या माहितीचा इतिहासाशीं मेळ कसा बसतो तें पाहूं.

स. १८१३ सालीं वांच्छानाथ काशीमध्यें होते हें श्लेषार्थचंद्रिकेवरून दिसतें. व १८१६ सालीं पुण्यास आल्यावर हिरण्यकेशी श्रौत–सूत्रावर व्याख्या लिहिण्यास सुरुवात केली; त्याची मिती अशी

> वस्वग्न्यद्रिक्षिति मिते शके वांच्छेश्वर सुधीः ।
> हिरण्यकेशीनां सूत्रं व्याख्यातुमुपचक्रमे ॥

वसु, अग्नि; अद्रि क्षिति म्हणजे १७३८ शक सन १८१६ या वर्षी टीकेचें काम सुरू झालें. त्यावेळेस वांच्छानाथ हे पटवर्धनांचे आश्रित होते असें २६ नोव्हेंबर १८१६ च्या पासपोर्ट मध्यें लिहिलें आहे. म्हणजे १८१६ सालीं ते पुण्यास

होते व ते १८१८ पर्यंत पटवर्धनांकडे राहिले व पुढें म्हैसूरकडे गेले. यावरून हें नक्की झालें कीं १८१६ चे नंतर ते काशीला गेले नाहींत. १८०० सालीं स्थापन केलेल्या ओरत्तनाडू येथील वेधशाळेंत ते शिक्षक होते. व तेथेंच सरफोजीचा व त्यांचा बेबनाव झाला व तेथून लगेच ते उत्तरेकडे निघाले. म्हणजे सन १८०० चे नंतर १–२ वर्षांत ते उत्तरेकडे निघाले असें समजावयाला हरकत नाहीं. आतां १८०२ ते १८१३ वांच्छेश्वर कोठे होते हा प्रश्न उरला. १८१६ चे नंतर जर काशीला गेले नाहींत तर

काशी–यात्रेच्छया गच्छन् कृष्णातीर–निवासिभिः।
पट्टवर्धन–वंशस्थैः प्रभुभिः संगतो मुदा ॥

ह्या श्लोकांत **काशीयात्रेच्छया गच्छन्** या वाक्याचा अर्थ बरोबर लागत नाहीं. पटवर्धनांची भेट काशी यात्रेला जातांना झाली हें इतिहासदृष्ट्या विसंगत दिसतें. जर तंजावर किंवा आरतनाडू येथून निघाल्यापासून परत म्हैसूर भागांत येईपर्यंतचा प्रवास हा सर्व काशी–यात्रेचाच प्रवास, असा अर्थ केला तर श्लोकाचा अर्थ बरोबर जमेल. याबद्दल पंडित अय्यास्वामि भाट्ट–चिंतामणिचे प्रस्तावनेंत लिहितात कीं,

काशीतः आगमन समये ... ... अयं यज्वा माधवराव परशुराम पट्टवर्धनादिभिः अति मात्र मादृतः। हें विधान मात्र इतिहासाचे दृष्टीनें बरोबर दिसतें.

वांच्छेश्वर पुण्यांत आले तेव्हां दुसरे बाजीराव होते,व दरबार पंडित चंद्रानारायण भट्टाचार्य होते. यावरून येवढेंच कळतें कीं सन १८०० ते १८१८ पर्यंत ते पुण्यास आले. ते जर १८१५ चे पूर्वी पुण्यास आले होते व त्याच वेळेस हिरण्यकेशि सूत्रा-वर व्याख्या लिहिण्यास सांगितली तर १८१६ पर्यंत कां लिहिली नाहीं ? पुण्याहून काशीस गेले, तर काशीला जातांना पासपोर्ट वगैरे कांहीं लागले नाहींत कां ? आतां दुसरा प्रश्न म्हणजे वांच्छेश्वर यांनीं टीकेच्या सुरुवातिस सांगितलें कीं त्यांचे गुरू ईश्वर शास्त्री श्रीनिवास शास्त्री व अहोबल शास्त्री हे गुरू होते. ईश्वरशास्त्री व श्रीनिवासशास्त्री हे त्यांचे वयाचे १८।२० वर्षांपर्यंत होते व पुढें ते वांच्छेश्वर ओरतनाडू येथून निघून उत्तरेस गेले. ते जर प्रथम पुण्यास आले व बरेच वर्षे पुण्यास राहून नंतर काशीस गेले; तर ते अहोबलशास्त्र्यांजवळ अध्ययन करावयास केव्हां राहिले. अहोबलशास्त्री तर वांच्छेश्वरच्या बाळपणांत ४।५ वर्षांच्या वयाचे असतांना म्हणजे टिपुराजा असतानांच रागावून काशीला गेले असें श्री वेंकटरामशास्त्री लिहितात; तर त्यांनीं अहोबलशास्त्रीं यांचेकडे अभ्यास केव्हां केला व काशीस असतांना बरींच पुस्तकें लिहिलीं तीं केव्हां लिहिलीं. ह्या सर्व गोष्टी पुण्यास दोनदां आले असें धरलें तर जमत नाहींत. म्हणून मला वाटतें की ते ओरतनाडू येथून १८०१।२ सालीं निघाले ते तडक काशीस गेले व तेथें अहोबल-

शास्त्री यांचेपाशीं अध्ययन केलें व श्री. नृसिंहभारती यांना शिकविलें व १८१६ चे पूर्वी व १८१३ चे नंतर पुण्यास आले, सन १८१३ चे अगोदर पुण्यास आलेच नाहींत असें माझें स्वतःचें मत आहे.

मागें मीं सांगितलें आहे कीं, "अडचार" या पोथीनें बराच घोटाळा केला आहे तो कसा तें पाहूं.

आतांपर्यंतच्या वादापासून तंजावर येथील पोथी सर्वांत जुनी आहे. म्हणून तीच कवीनें लिहिलेली पोथी म्हणून आपण गृहीत धरीत आलों. ह्या पोथींत १०२ श्लोक आहेत. व तेच श्लोक अडचार, म्हैसूर व श्रीरंगम् येथील पोथींत आहेत. तेव्हां तंजावरची पोथी मूळ पोथी ठरविली. आतां उत्तरेकडच्या पोथींतून १०७ श्लोक आहेत. म्हणजे कोणते तरी ५ श्लोक प्रक्षिप्त आहेत. व ते म्हणजे भांडारकर इन्स्टिटयूट पोथींतले श्लोक नं. २९, ८८, ९१, ९२ व १३ हे श्लोक अड्यार, तंजावर म्हैसूर व श्रीरंगम् या पोथींत नाहींत; पण अड्यार तेलगू म्हणून जी पोथी आहे असें सांगितलें त्यांत श्लोक नं. २९, ८८, ९१ व ९२ आहेत. "अड्यार तेलगू" ही पोथी तर जुनी आहे असें के. माधवकृष्ण शर्मा म्हणतात. मग हे श्लोक यांत कसे आले व बाकीच्या पोथ्यांतून कां वगळले ? तेव्हां हे श्लोक जर जुनेच आहेत असें धरलें तर फक्त १ च श्लोक प्रक्षिप्त राहिला व तो म्हणजे १३ वा. हा घोटाळा ही पोथी हातीं आल्याशिवाय निकालांत निघणें शक्य दिसत नाहीं. तेव्हां हा निबंध वाचण्याचा हेतु एवढाच कीं, या काव्याबद्दलची माहिती समग्र व इतिहासाला धरून असावी व या दृष्टीनें ज्या ज्या गोष्टी मला विसंगत दिसल्या किंवा ज्या गोष्टीचा निर्णय मला करतां आला नाहीं त्या गोष्टी आपल्यापुढें मांडल्या आहेत व आपण याचा विचार करून उणीव भरून काढण्यास मदत करावी.

---

# ९ "सभासद"

(इ. स. १२००—१८१८.)

(ले. विठ्ठल त्र्यंबक गुण्ये, एम्. ए.)

**कागदपत्रांतील उल्लेख—**

(१) "पा हुजुरू बा खान आलीशान रफअल मकान शहानवाजखान मजालसी हुजुरु"

(ऐ. फा. सा. खं. ३ ले ३५ ता. १६०३ फेब्रु. ५)

( २ ) " दुसरा इब्राहीम आदिलशाह—शाह नवाजखान **सरमज्लिसी** याजतर्फेचे अधिकारी व देसाई परगणे गदग. "

( ऐ. फा. सा. खं. ३ ले. ४४, **ता. १६१६ जाने. २४.** )

( ३ ) " दुसरा इब्राहीम आदिलशाह—देसाई परगणे गदग.
............हुप. व दियानतुल्मुल्क **सरे मजलिस** याच्या माहितीनें "

( ऐ. फा. सा. खं. ३ ले. ५६, **ता. १६२१ फेब्रु. ८.** )

( ४ ) " दुसरा इब्राहीम आदिलशाह—देसाई परगणे गदग.
............हुप फर्जंद शाहनवाझखान **सरमजलिस** याच्या माहितीनें "

( ऐ. फा. सा. खं. ३ ले. ५९, **ता. १६४४ डिसें. ६.** )

( ५ ) " दुसरा इब्राहीम आदिलशाह—देसाई परगणे गदग.
............हुप. फर्जंद शाह नवाझखान **सरे मजलिस** याच्या माहितीनें "

( ऐ. फा. सा. खं. ३ ले. ६० **ता. १६२५ मार्च १.** )

( ६ ) " ( फारसी मजकूर ) व हाजीरमजालस.
मसरुलहजरत रायाजी रो पंडित **मजालसी** ......... "

महजरांतील उल्लेख; ( शि. च. सा. खं. ३ ले. ६३८
इ. स. **१६५४ जाने. १.** )

( ७ ) " रख्तखाना
............राजश्री बाबाजी नाईक पुंडे **मजालसी**, राजश्री बाळाजी हरि **मजालसी** "

महजरमजलसींतील उल्लेख—( शिवाजीमहाराज हजर ).
( म. इ. सा. खं. १७ ले. १०, **१६५७ मार्च २१.** )

( ८ ) " निवाडपत्र हाजीर मजालसी

राजमुद्रा
पदो नारायण **सभासद नामजाद किले कोंडाणा** "

( शि. च. सा. खं. २ ले. ९८, **१६५८ आक्टो. ३.**)

( ९ ) " दुसरा अली आदिलशाह—देसाई तपे साळशी
..............बाबाजी शाम......( पडिंत १ ) **मजलिसी व सुभेदार तळकोंकण** "

( ऐ. फा. सा. खं. ३, ले. ९२, **१६६१ डिसें. २०.** )

(१०) " अलि आदिलशाह—देसाई परगणे कागल
..............हरि अमीनराव मजलसी.........**दियानतराव मजलसी** "

( ऐ. फा. सा. खं. १, ले. ३०, **१६७४ मार्च १.** )

(११) " पत्रवेतन विशेष. मा। शंकराजी बाजी प्रभु **सभासद सेवक** राजमंडल
............शंकराजी नारायण याजकडे सभासदाची सेवा करीत होते ............सभासदांतच करार करून सरंजामी केली २००० होनू

ता।

खा। जातीस बेडा च्याकर २४ यैन ४००

१६००

येकूण १॥ बेडा दोन हजार यास कदीम वेतन दीड हजार व हाली सरंजाम पांचशे होनू. येणे प्रो रास केले असेती. "

( पेशवा दप्तर. वि. ३१ प. नं. ५९, **१६९३ मे २७.**)

(१२) " महजरनामा.....हाजीरमजालसी......
.......राजश्री महादजी बावाजी **सभासद**

राजश्री केशो बाजी **सभासद** — राजश्री रंगोराम **सभासद**

मुद्रा मराठी — दिा सरसुभा

( श्री राजाराम पदपंकज सेवनी तत्पर केसो बाजी ) — राजश्री बहिरो त्रिमल. मुद्रा "

( ऐ. सं. सा. खं. ६ ले. ९, **१६९४ एप्रील १२.** )

(१३) महजराच्या मजकुरांतील उल्लेख.
" महादाजी बलाल सभासद नामजाद सुभा मामले दाभोल
........**बाळाजी विश्वनाथ सभासद.........** "
" मजलसीत राजश्री बाळाजी विश्वनाथ देशमूख मामलेदंडा राजापुरी "

( म. इ. सा. खं. २१ ले. ८, **१६९७ मे १६.** )

( १४ ) " राजमंडल रोजकीर्द सुरु इसने
………आश्रित………कारकून
दि॥ दबिरी…………केशव त्रिंबक मान्य पुरुष
त्रिंबक विठ्ठल खासनीस

**सभासद**
नीलकंठ राऊ
शंकराजी नारायण
मुकुंद लिंगोजी……… "

( पे. दप्तर वि. ३० नं. ३०७, इ. स. १७११ )

( १५ ) " निवाडपत्र………हाजीरानी मजालसी; राजमुद्रा
राजश्री कृष्णाजी विठल **सभासद**
नामजाद सुभा प्रांत कन्हाड……"
( म. इ. सा. खं. २१ ले. १११, इ. स. **१७२३** )

( १६ ) " कृष्णाजी अनंत **सभासद** राजमंडळ १६९४ " (सभासद–बखर )

( १७ ) Bombay Gazetteer Poona Vol. X VIII (Part iii) P. 332. पेशवाईतील सुभ्याच्या दरकदारामध्यें पुढील उल्लेख आहे. "Sabhasad kept a register of petty suits and reported them to the Mamlatdar. He received £25 ( Rs. 250 )"

**निष्कर्ष—**

( १ ) 'सभासद सुभेदार' यास स्वराज्यागमनापूर्वी 'मजलसी सुभेदार' म्हणत असावेत. ( पहा क्र. ९. )

( २ ) सभासद हा सरकारी अधिकारी आहे. मध्यवर्ती व त्याचप्रमाणें प्रांतिक राज्यकारभारांत 'सभासद' हा हुद्दा ( office ) आढळून येतो. त्याचें काम बहुधा सल्लामसलत देणें व न्याय–निर्णय करणें असें असावें. राजारामाच्या काळांत राजमंडलाच्या सभासदाचा तनखा २००० होनां- पर्यंत होता असें दिसतें ( पहा क्र. ११. ). पेशवाईत प्रांतिक सभासदाचा तनखा २५० रु. दिला आहे.

( ३ ) कृष्णाजी अनंत हा शिवचरित्रकार ' सभासद ' होता यावरून ' सभासद ' बहुधा विद्वान् बहुश्रुत असावेत.

( ४ ) ' सरेमजलसी ' वगैरे उल्लेखांवरून आदिलशाही राज्यव्यवस्थेंत रस्त-खान्यांतील अधिकाऱ्यांपैकींच पातशहास सल्ला देणारी एक छोटी सभा ( Council ) असावी व तिचा सभासद होणें म्हणजे मोठ्या मानाचें व अधिकाराचें द्योतक असावें.

( ५ ) स्मृति ग्रंथांतून किंवा संस्कृत कोशांतून ' न्यायाधीश ' हा शब्द आढळून येत नाहीं. स्वराज्यांत तो रूढ झाला असावा. राज्यव्यवहार–कोशावरून पहातां दक्षिणेंतील मुसलमानींत केंद्रीय न्यायाधिकाऱ्यास ' आदिल ' शब्द वापरीत असें दिसतें. मात्र त्यास कागदपत्रीं पुरावा उपलब्ध नाहीं.

स्मृति व नीति ग्रंथांतील राज्यकल्पनेंत केंद्रीय न्यायाधिकाऱ्यास ' प्राड्विवाक् ' हा शब्द आढळून येतो व प्रांतांतील राज्याधिकाऱ्यास ' सभ्य ' किंवा ' सभासद ' हा शब्द योजिला आहे.* याविषयीं ताम्र-पत्रांचा पुरावा पहाणें जरूर आहे.

मुसलमानींत प्रांतांतील एतद्देशीय न्यायदानपद्धतींत तसा कोणताच बदल झालेला आढळून येत नाहीं. तथापि शब्दांची थोडीफार देवाण घेवाण झालेली दिसते व हें अगदीं साहजिक आहे. कोणत्याहि परकीय सत्तेस न्यायासारख्या महत्त्वाच्या खात्यांत एकदम बदल घडवून आणणें सत्तासंरक्षणाच्या दृष्टीनें नेहमीं कठीण असतें व त्याकाळीं तरी निदान महाराष्ट्राच्या एकंदर परिस्थितीच्या दृष्टीनें निश्चित असें होतें. याचा परिणाम म्हणजे सभासद हा हिंदु राजवटीमधील शब्द मुसलमानींत मजलसींत रूपांतरित झाला व पुनः स्वराज्य आगमनानंतर पूर्वीप्रमाणेंच रूढ झाला. तो तसाच इंग्रजीपर्यंत कायम होता. असा या ' सभासदाचा ' सुमारें सहाशें वर्षांचा इतिहास आहे.

---

* याज्ञवल्क्य ( मिताक्षरा ), व्यवहार, श्लोक २, ३, ३०.

# ऐतिहासिक संकीर्ण निबंध खंड ४ था

## सूची

# भारत–इतिहास–संशोधक–मंडळ–स्वीय–ग्रंथमाला

* हा ग्रंथ मुंबई सरकाराच्या प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकालयासाठीं मंजूर. ‡ हा शैक्षणिक ( training ) संस्था व शिक्षकग्रंथालयें यांसाठीं मंजूर.

१ अहवाल ( शक १८३२ ) ३
२ „ ( शक १८३३ ) ५
३ सुचंत विचार(कै.वि.का.राजवाडे)१०
४ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३४ ) ५
५ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १२ (कै.वि.का.राजवाडे)१।८
*६ प्रथम संमेलन वृत्त(शक १८३५)०१२
*७ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३५ ) ६
*८ द्वितीय संमेलन वृत्त ( शक १८३६ )३
*९ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३६ ) ३
*१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २० ( शिवकालीन घराणीं )३
*११ वार्षिक इतिवृत्त (शक १८३७)६
*१२ तृतीय संमेलन-वृत्त(शक १८३७)३
*१३ मुकुंद–महाभाष्य ( संस्कृत ) ०८
*१४ ग्रंथराज ( दासोपंत ) ०८
*१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला ०१२
*१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा ०१२
***मंडळ–त्रैमासिक** प्रत्येक पुस्तक ३
*१७ वार्षिक इतिवृत्त ( शक १८३८ ) ३
१८ चतुर्थ-संमेलन-वृत्त (शक१८३८)३
*१९ राजवाडे-खंड-स्थलसूची ४
*२० पंचम संमेलन-वृत्त (शक १८३९)३
२२ चंद्रचूड–दप्तर–कला १ ३
२३ महाराष्ट्र–सारस्वत (संपलें) १०
२४ षष्ठ संमेलन-वृत्त ( १८४० ) ४
२५ सप्तम संमेलन-वृत्त ( १८४१ ) ३
२६ संशोधकाची छोटी जंत्री ०४
२७ प्रदर्शन परिचय ०४
*२८ फारसी पत्रव्यवहार ५
२९ फार्सी–मराठी कोश ४
३० शिवचरित्रसाहित्य खंड १ ला १।८
३१ Historical Miscellany १
३२ पुरंदरे-दप्तर भाग१ ४
३३ शिवचरित्रसाहित्य खं. २ रा ४
३४ द. मध्ययु. इ. साधनें खं. १ २
३५ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खं. १,२
३६ राजाराम–चरितम् १।८
३७ मंडळांतील नाणीं १
†३८ शिवचरित्रसाहित्य खंड ४ १।८
३९ गोवळकोंड्याची कुत्बशाही रु. ४
†४० ऐतिहासिक फारसी साहित्य रु.१।८
†४१ द० मध्ययुगीन इ. सा. खंड. २
†४२ ऐतिहासिक संकीर्ण सा.खंड२ १।८
४३ मंडळ चित्र ग्रंथ चित्रें २० ०८
४४ शिवकालीन पत्रसारसंग्रह खं.३ २॥
‡४५ विजयनगर स्मारकग्रंथ ४
†४६ ऐतिहासिक फारसी सा.खंड२ १।८
४७ शिवचरित्रसाहित्य खं. ६ १।८
†४८ मराठी सत्तेचा उत्तरविस्तार०१२
४९ शिवचरित्रवृत्तसंग्रह कानडा १
५० शिवचरित्रसाहित्य खंड ७ १।८
†५१ ऐतिहासिक फार्सी साहित्य ३ १।८
५२) शिवचरित्रवृत्तसंग्रह २ व ३
†५३) खंड: फार्सी विभाग प्रत्येकीं १।४
५४ पुणें नगर संशोधन–वृत्त खंड १ रु.१
५४अ ऐ. सं. सा. खं. ३ ३
५५ शिवचरित्रसाहित्य खंड ८ १।८
५५अ शि. च. सा. खं. ५ ३॥
५६ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ४ २
५७ ऐ.संकीर्ण वाङ्मय साहित्य खं.१ १।८
५८ शिवकालीन दंडनीति– ३
५९ पुणें नगरसंशोधन वृत्त खं.२ १।८
६० ऐ. संकीर्ण निबंध खंड १ १।८
६१ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ५ १।८
६२ शिवचरित्र साहित्य खंड ९ १।८
६३ हिंगणे दफ्तर १ ला खंड ३
६४ ऐ. सं. सा. खं. ६ १।८
६५ ऐ. सं. निबंध ३ २
६६ पुणें नगरसंशोधनवृत्त खं. ३ १।८
६७ महाराष्ट्रांतील ताम्र-शिलालेख ३
६८ संकीर्ण साहित्य खं. ७ २
(६९) ऐ. संकीर्ण निबंधखंड ३ रु. २
(७०) हिंगणे दप्तर खंड २ रु. ३
(७१) आंग्रेकालीन पत्रव्यवहार २

(७२) ऐ. संकीर्ण निबंध खंड ४ रु. २॥ | (७३) पेठे पत्रव्यवहार, रु. ३

टीप–ट. ह. व येगी, व्ही. पी. वगैरे खर्च निराळा पडेल. † हा ग्रंथ त्रै. मासिकांत भागशः प्रसिद्ध झाला आहे. ४०–४२,४६,४८,५१, ५३ स्वतंत्रहि मिळतात.

## भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-पुरस्कृत-ग्रंथमाला

(१) मठगांवचा शिलालेख–कै. रा. च. चांदोरकर. रु. २ व रु. १०१४
(२) पर्णालपर्वतग्रहणाख्यानम् रु. ०१० व ०८
(३) श्री शिवभारत मूळ व मराठी भाषांतर मूल्य रु. ६ व ५०१२
(४) शिवचरित्रप्रदीप कागदी व कापडी. रु.३॥ व ४ आणि रु.३।व३॥
(५) हिंदी शिल्पशास्त्र भाग १ ला. कै. रा. सा. रु. वि. वझे रु. ३ व रु. २
(६) शिवकालीन जंत्री शके १५५१–१६५०–कै. ग. स. खरे रु. ५॥।
(७) साधन–चिकित्सा –वा. सि. बेन्द्रे. रु. ३॥ व रु. ३
(८) ऐतिहासिक पोवाडे–य. न. केळकर. रु. ३ व रु. २॥
(९) वाठारकर निंबाळकर–इतिहास रु. १॥ व १०३०३
(१०) भूतेश–आख्यान (०१२ व ०१०)
(११) कऱ्हाड,(श्री. य. रा. गुप्ते, बी.ए )०८
(१२) ऐतिहासिक प्रस्तावना–कै. वि. का. राजवाडे रु.३ व २०६ ०६
(१३) राजवाडे यांचे संकीर्ण निबंध श्री. शं. ना. जोशी रु. २ रु.१॥
(१४) राजवाडे संकीर्ण निबंध भाग ३ रा. श्री. शं. ना. जोशी २ व १०१४
(१७) पुरंदरे–दप्तर, भाग २ रा. रु. ३ व रु. २॥
(१८) The Escape of Shivaji from Agra रावसो देशपांडे–रु.३ व २॥
(१९) लोककथा, कापडी, कागदी रु. १॥ व रु. १ १।व ०१४
(२०) पानसे घराण्याचा इतिहास कै. रा. ब. पानसे रु. ३ व रु. २॥
(२१) कै. वासुदेवशास्त्री खरे–चरित्र श्री. दा. मो. भट रु. २॥ व रु.२।~
(२२) लोककथा भाग २ रा. रु. १०८ व १०४ व १०४व०१४
(२३) संपूर्ण भूषण रु. १०८ व १०४
(२४) शिवचरित्रसाहित्य खंड ३ रा शं. ना. जोशी व ग. ह. खरे पृ. २८२ –रु. ३ व रु. २०८
(२५) राजधानी रायगड रु. १ व ०१२
(२६) Shivaji pp. Rs. 3 and Rs. 2–8–0
(२७) आळंदी पृ. २०–श्री .ग. ह. खरे०२
(२८) मठगांवचा शिलालेख : कुडाळप्रांतेतिहास बाळावलकर रु.१०२व०१२
(२९) पुरंदरे दप्तर भाग ३ रा ३ रु. व रु. २०८
(३०) मध्वमुनीश्वराची कविता ३ व २०८
(३१) मराठ्यांच्या उत्तरेकडील मोहिमा पृ.९०-डॉ.वि.गो.दिघे रु. १व०१२
(३२) वेदस्तुति आणि स्फुट कविता कृष्णदयार्णवकृत–०१२ व०१०
(३३) ज्ञानप्रदीप रु.१ व ०१२
(३४) पेशवाईच्या सावलींत रु. ४ व ३.
(३५) मूर्तिविज्ञान श्री. ग. ह. खरे ९४ चित्रें; रु. ३०८ व ३
(३६) आठल्ये घराण्याचा इतिहास–वि. वा. आठल्ये पृ. ४४० ३॥–३.
(३७) किल्ले पुरंदर किं. १ व ०१४
(३८) किल्ले विशाळगड पृ.९३किं.०व०१२
(३९) श्रीशिवकाव्य पृ. २६६–रु. २॥ व २
(४०) गुण्ये घराण्याचा इतिहास रु. १०
(४१, ४२) वैद्य दप्तर खंड १ व पुरवणी. शं. ल. वैद्य २॥ व ३ रु.
(४३) खेड (जि पुणें) वर्णन (य.रा.गुप्ते)०८
(४४) श्री क्षेत्र हरिहरेश्वर वर्णन परांजपे रु.१
(४५, ४६) वैद्य दफ्तरांतून निवडलेले कागद–चैत्र खंड २ व ३ रु.२ व रु.३
(४७) चिमाजी आपा-कृ. वा. पुरंदरे रु.३
(४८) ऐ. लेखसंग्रह खं.१५ य.वा खरे रु. ८